**चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र.**
**बांधकाम अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.** (Academic Block, West)

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१७/प्र.क्र.७२/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०८ मार्च, २०१७

**वाचा :-** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष २४(३)/वअ/१०३६/२०१६-१७, दिनांक २५.१.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली येथे बांबू संशोधन केंद्र व प्रशिक्षण केंद्रामध्ये शैक्षणिक इमारतीचे पश्चिमेकडील भागाचे (Academic Block, West) बांधकामाच्या रू.४९६.९६ लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली येथे बांबू संशोधन केंद्र व प्रशिक्षण केंद्रामध्ये शैक्षणिक इमारतीचे पश्चिमेकडील भागाचे (Academic Block, West) बांधकामाच्या रू.४८८.०० लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ नुसार दिलेल्या सहमतीस व खालील अटींच्या अधीन राहून, शासनाची प्रशासकीय मान्यता **(वित्तीय मान्यता वगळून)** देण्यात येत आहे.

१. सदर काम जर अर्थसंकल्पातून करावयाचे झाल्यास त्यात ५% सेंटेज चार्जेसची तरतूद वगळण्यात यावी.
२. सदर बांधकामाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१४/प्र.क्र. ९६/इमा-३, दिनांक ८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
३. प्रस्तुत कामाचा सविस्तर ले-आऊट सरकारी वास्तुविशारदांकडून मंजूर करून घेण्यात यावा. तसेच त्यावर व अंदाजपत्रकावर सक्षम अधिकाऱ्यांची स्वाक्षरी घेण्यात यावी.
४. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पुर्तता करुन घ्यावी.

५. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे. त्याचबरोबर अंदाजपत्रकातील काही बाबींसाठी दरसूचीबाह्य दर वापरण्यात आलेले आहेत. या बाबींसाठी आवश्यक असणारी दरपृथकरणे तयार करून त्यास अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर यांची मंजूरी घेण्यात यावी.

६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/ २०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१०११५८५७६९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.03.10 11:59:20 +05'30'

**( प्रकाश महाजन )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर.
४. विभागीय वन अधिकारी, चंद्रपूर वनविभाग, चंद्रपूर.

५. संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली स्थित, चंद्रपूर.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
८. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
९. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१०. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती).

# प्रपत्र-अ

**Name of Work :-** Construction of Academic Block (West) for Bamboo Training and Research Center at Chichpalli Dist. Chandrapur

## Recapitulation Sheet

| Sr. No | Perticulars | Amount in Rs |
|---|---|---|
| 1 | Estimate- Academic Block (West) | 3,37,71,000.00 |
| 2 | Add 11% for Electrification | 41,10,810.00 |
| 3 | Add 8% for Plumbing and Sanitation | 29,89,680.00 |
| 4 | Add for Fire Fighting Equipment (L.S.) | 3,00,000.00 |
| | **Total** | **4,47,71,490.00** |
| 5 | Add 4% for Contingencies Charges | 17,90,860.00 |
| 6 | Add 5% for Centage Charges (Being Deposit Work) | 22,38,575.00 |
| | **Grand Total** | **4,88,00,925.00** |
| | **Say Rs** | **4,88,00,000.00** |

*******************